वार्षिक योजना सन २०१४-१५
पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या निवासी इमारतींच्या बांधकामासाठी निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः सीआरपी - ०९१३/प्र.क्र. ३३६(३) / पोल-७,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २६ नोव्हेंबर, २०१४.

**वाचा -**

१) क्रमांकः पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं /२७-अ / वार्षिक योजना / २०१४-१५/०१, दिनांक ४.६.२०१४.

२) क्रमांकः वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/ प्र.क्र. ११०/ अर्थ-३, दिनांक १.७.२०१४.

## शासन निर्णय -

पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या निवासी इमारतींच्या बांधकामासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रुपये १.२१ कोटी इतकी तरतूद अर्थसंल्पित करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १ जुलै, २०१४ च्या परिपत्रकातील सूचनेनुसार सदर तरतूदीच्या ६० % च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या निवासी इमारतींच्या बांधकामासाठी खालील दर्शविल्यानुसार रुपये ७२,६०,०००/- (रुपये बाहत्तर लक्ष साठ हजार फक्त) वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | वितरीत निधी (आकडे रुपयांत) |
|---|---|---|
| १ | पोलीस प्रशिक्षण केंद्र खंडाळा येथील २७ अधिकारी निवासस्थाने बांधकाम करणे | ५९,९९,००० |
| २ | पुणे १५१ निवासस्थाने पोलीस प्रशिक्षण केंद्र नानवीज | १२,६१,००० |
| | **एकूण** | **७२,६०,०००** |

२. उपरोक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढून ती पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याबाबतचा खर्च "मागणी क्र.बी-१०, लेखाशिर्ष, ४०७०, इतर प्रशासकीय सेवांवरील भांडवली खर्च, (००) (१०) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस प्रशिक्षण शाळेसाठी निवासी इमारतीचे बांधकाम करणे (योजनांतर्गत) दत्तमत (४०७० ०२२२) ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४११२७१७३३४६१४२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/ प्र.क्र. ११०/ अर्थ-३, दिनांक १.७.२०१४ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitra Shahaji Patodekar

Digitally signed by Chitra Shahaji Patodekar
DN: CN = Chitra Shahaji Patodekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.11.29 16:38:03 +05'30'

**(चित्रा पाटोदेकर)**
अवर सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा/लेखावअनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
९. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (पोल-७)